**शासकीय तथा अशासकीय पूर्णतः अनुदानित शासन मालकिच्या स्वायत्त अभियांत्रिकी महाविद्यालये/ संस्थांमधील नियामक मंडळावर राज्य शासनाद्वारे नियुक्त अध्यक्ष व सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करण्याबाबत.....**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१११९/(०२/२०)/तांशि-२**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १० जानेवारी, २०२०

**<u>संदर्भ</u> :** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण- २०१३/(१२९/१३)/तांशि-२, दिनांक २१/९/२०१६

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण- २०१३/(१२९/१३)/तांशि-२, दिनांक २०/११/२०१८

३) शासन शुध्दीपत्रक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण- २०१३/(१२९/१३)/तांशि-२, दिनांक ३१/१२/२०१८

४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक टीईएम-२०१६/प्र.क्र.२७/तांशि-४, दिनांक २४/०१/२०१९

५)शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-२०१३/(१२९/१३)/तांशि-२, दिनांक ०७/०३/२०१९

**प्रस्तावना :**

तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम टप्पा -१ व २ च्या (TEQIP) अनुषंगाने स्वायत्तता प्राप्त केलेल्या राज्यातील ६ शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालये आणि २ शासन मालकिच्या १०० टक्के अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालयांच्या नियामक मंडळाचे (Board of Governance- BoG) गठण शासनाकडून करण्यात येते. सदरच्या नियामक मंडळाचे गठण हे विद्यापिठ अनुदान आयोगाने निर्गमित केलेल्या अधिसूचनेतील तरतुदीनुसार करण्यात येते. त्यानुसार शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद व श्री गुरुगोविंद सिंगजी इन्स्टिटयुट ऑफ इंजिनियरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, नांदेड या दोन संस्थांच्या नियामक मंडळांचे संदर्भाधिन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये गठण करण्यात आले आहे. तसेच शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे, अमरावती, कराड, जळगांव, चंद्रपूर व वीरमाता जिजाबाई टेक्निकल इन्स्टिट्युट, माटूंगा, मुंबई, या ६ संस्थांमधील नियामक मंडळाचे संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक २०/११/२०१८ च्या शासन निर्णयानुसार गठण करण्यात आले आहे. त्याच प्रमाणे संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक २०/११/२०१८ च्या शासन निर्णयानुसार शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेच्या नियामक मंडळाच्या अध्यक्षपदी नियुक्त केलेल्या अध्यक्षांऐवजी संदर्भाधिन क्रमांक-३ येथील दिनांक ३०/१२/२०१८ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेच्या नियामक मंडळावर नव्याने अध्यक्षांची नियुक्ती करण्यात आली आहे.

श्री गुरुगोविंद सिंगजी इन्स्टिटयुट ऑफ इंजिनियरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, नांदेड या संस्थेच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या नियामक मंडळाचा कालावधी संपल्याने संदर्भ क्रमांक ५ येथे नमुद शासन निर्णयान्वये सदर संस्थेच्या नियामक मंडळाचे गठण करण्यात आलेले आहे. तसेच, हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड केटरींग टेक्नॉलॉजी, पुणे या संस्थेच्या नियामक मंडळाचे संदर्भ क्रमांक ४ येथे नमूद शासन निर्णयान्वये गठन करण्यात आलेले आहे.

उपरोक्त संदर्भ क्रमांक १,२,३,५ येथील शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या नियामक मंडळाची मुदत दोन वर्षाची आहे व संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड केटरिंग टेक्नॉलॉजी महाविद्यालय या महाविद्यालयाच्या नियामक मंडळाची मुदत पाच वर्षांची आहे.

संदर्भाधिन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद या संस्थेच्या नियामक मंडळांची मुदत दिनांक २८/०९/२०१८ रोजी संपुष्टात आलेली असून नव्याने गठण करण्यात आलेले नाही. तसेच संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये गठित संस्थांच्या नियामक मंडळांची मुदत सन २०२० अखेर पर्यत संपुष्टात येणार आहे. राज्यातील ६ शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालये, २ शासन मालकिच्या १०० टक्के अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये आणि १ हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड केटरिंग टेक्नॉलॉजी महाविद्यालय यांच्या नियामक मंडळाचे (Board of Governance- BoG) एकत्रितरित्या गठण करण्याची बाब विचाराधीन असल्याने सदरच्या नियामक मंडळावर राज्य शासनाद्वारे नियुक्त सदस्यांची नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम टप्पा (TEQIP) -१ व २ च्या अनुषंगाने स्वायत्तता प्राप्त केलेल्या राज्यातील ६ शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालये व २ शासन मालकिच्या १०० टक्के अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये आणि हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड केटरिंग टेक्नॉलॉजी महाविद्यालय, पुणे येथील नियामक मंडळावर (Board of Governance- BoG) संदर्भाधिन क्रमांक १ ते ५ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनाद्वारे नियुक्त करण्यात आलेल्या अध्यक्ष व सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करण्यात येत आहे. सदर संस्थांच्या नियामक मंडळावर राज्य शासनाद्वारे करण्यात येणा-या नियुक्त्यांबाबत स्वतंत्रपणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११०१७०७५०१५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Bhaskarrao Avhad

Digitally signed by Prakash Bhaskarrao Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e09e7338f45626229cb6381e8154da93814d3127e9859a46e544f505defcd004, cn=Prakash Bhaskarrao Avhad
Date: 2020.01.13 17:24:34 +05'30'

**( प्रकाश भा. आव्हाड )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) मा. सचिव, मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
७) मा. सचिव, आर्थिक कार्य विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली.
८) मा. सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली.
९) मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
१०) संचालक, राष्ट्रीय परियोजना कार्यान्वयन एकक, एडसिल हाऊस, चतुर्थ तल, १८ अे, सेक्टर १६-ए, नोएडा (उ.प्र)
११) संचालक, अखिल भारतीय तंत्र शिक्षा परिषद, नवी दिल्ली
१२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३) संचालक, अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे
१४) संचालक, वीरमाता जिजाबाई टेक्निकल इन्स्टिटयूट, माटुंगा, मुंबई
१५) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती
१६) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड
१७) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव
१८) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर
१९) प्राचार्य, सर्व शासकीय अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये
२०) प्राचार्य, हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड केटरिंग टेक्नॉलॉजी, पुणे
२१) सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण
२२) सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई
२३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
२४) महालेखापाल (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
२५) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/ निवासी लेखा परीक्षा अधिकारी
२६) कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापिठ, लोणेरे
२७) कुलगुरु, रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई
२८) कुलसचिव,सर्व अकृषी विद्यापीठे
२९) उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने
३०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क मंत्रालय, मुंबई
३१) अवर सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
३२) निवड नस्ती - तांशि-२.